**सन २००९-२०१० या आर्थिक वर्षात मराठवाडा पाणलोट विकास मिशन अंतर्गत पाणलोट विकास प्रकल्प राबविण्यासाठी निधी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
**शासन निर्णय क्रमांक : मपामि २००९/प्र.क्र.७४/जल-७,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : १५ मार्च , २०१०.**

वाचा :- ग्राम विकास व जलसंधारण विभाग शासन निर्णय
(१) क्रमांक : एसएलएफ १८/०५/प्र.क्र.४८०/जल-१२, दि.२४ ऑक्टोबर, २००५ व दि.८ मार्च, २००६.
(२) क्रमांक : एसएलएफ १८/०५/प्र.क्र. ४८० (भाग-२ब)/जल-१२, दि.१३ सप्टेंबर, २००६.
(३) क्रमांक : एसएलएफ २००६/प्र.क्र.१०९/जल-१२, दि.१४ फेब्रुवारी, २००७, दि.२८ फेब्रुवारी, २००७ व दि.१५ मार्च, २००७.
(४) क्रमांक : एसएलएफ २००७/प्र.क्र.८६/जल-१२, दि.७ जुलै, २००७.
(५) क्रमांक : मपामि २००७/प्र.क्र.१२५/जल-७, दि.२९ डिसेंबर, २००७ व दि.२९ मार्च, २००८.
(६) क्रमांक : मपामि २००८/प्र.क्र.९१/जल-७, दि.१७ जुलै, २००८ व दि.४ फेब्रुवारी, २००९.
(७) क्रमांक : जलसं २००८/प्र.क्र.१५९/जल-७, दि.२७ ऑक्टोबर, २००८.
(८) संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, कृषि आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्र.मृदसं/मृद-४/मपाविमि/अनुदान/६७६/२०१०, दि.३१ जानेवारी, २०१०.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्यातील पडीक / अवनत जमिनीचा विकास करण्यासाठी शासनाने पाणलोट आधारित विकास कार्यक्रमावर भर दिला आहे. त्यानुसार मराठवाडा विभागाची विशिष्ट भौगोलिक परिस्थिती जसे जास्त कोरडवाहू क्षेत्र, कमी नैसर्गिक वनस्पती असल्यामुळे पाण्याची टंचाई सतत असते, भूगर्भातील पाण्याची पातळी सुध्दा कमी होत असल्यामुळे या विभागातील भूगर्भातील पाण्याची पातळी वाढविण्याच्या दृष्टीने संदर्भाधीन दि.२४ ऑक्टोबर, २००५ अन्वये मराठवाडा पाणलोट विकास मिशनची स्थापना करण्यात आली आहे. त्यानुसार हा कार्यक्रम मराठवाडा विभागातील औरंगाबाद, जालना, बीड, लातूर, उस्मानाबाद, नांदेड, परभणी व हिंगोली या ८ जिल्हयांत पुढील ४ वर्षासाठी राबविण्याचे निश्चित करण्यात आले आहे.

२. संदर्भाधीन दि.१३ सप्टेंबर, २००६ च्या शासन निर्णयानुसार मराठवाडा पाणलोट विकास मिशनच्या सुधारित मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या असून त्यानुसार गाव स्तरावर ग्राम विकास समिती, जिल्हा स्तरावर जिल्हा पाणलोट विकास मिशन, विभागीय स्तरावर विभागीय पाणलोट विकास मिशन व पाणलोट विकास पथके स्थापन करण्यात आलेली आहेत. जिल्हा पाणलोट विकास समितीची पाणलोटाच्या आराखडयास तांत्रिक व प्रशासकीय मंजूरी देणे, वार्षिक कृती आराखडयास मान्यता देणे, प्रकल्प अहवालास अंतिम मान्यता देणे इ. मुख्यत्वे कार्ये आहेत. विभागीय पाणलोट विकास समितीची पाणलोट निवडीस अंतिम मान्यता देणे, प्रकल्पाचे मूल्यमापनासाठी त्रयस्थ संस्थेची निवड करुन मूल्यमापन करुन घेणे, प्रत्येक जिल्हयात पाणलोट संरचनेवर आधारित स्थानिक गरजेप्रमाणे मेगा पाणलोट, सूक्ष्म पाणलोट इ. ची निवड करणे आणि स्थानिक परिस्थितीनुसार प्रकल्प पाणलोट निवडीचे निकष व प्रकल्पांतर्गत येणा-या गावासाठी निकषात बदल करणे इ. मुख्यत्वे कार्ये आहेत.

--२.

३. या मिशनद्वारे एकात्मिक पाणलोट व्यवस्थापन संकल्पनेच्या माध्यमातून प्रथमच मेगा पाणलोट विकासाची सर्व प्रकारची कामे करुन पर्जन्याधारित शेतीमध्ये स्थिरता आणण्याचे प्रयत्न करण्यात यावेत याबाबींचा समावेश करण्यात आलेला आहे. मराठवाडा पाणलोट विकास मिशनच्या अंमलबजावणीकरीता आतापर्यंत एकूण रु.१०४.०० कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे.

४. संदर्भाधीन दि.२७ ऑक्टोबर, २००८ अन्वये पाणलोट क्षेत्र विकासाकरीता प्रति हेक्टरी मापदंड सुधारित करण्यात आल्यामुळे मराठवाडा पाणलोट विकास मिशनचा मूळ कार्यक्रम जिल्हा पाणलोट विकास समिती व विभागीय पाणलोट विकास समितीने दिलेल्या मान्यतेनुसार सुधारित करण्यात आला. सन २००९-१० या आर्थिक वर्षात मराठवाडा पाणलोट विकास मिशनच्या सुधारित कार्यक्रमासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मराठवाडयातील औरंगाबाद, जालना, बीड, लातूर, उस्मानाबाद, नांदेड, परभणी व हिंगोली या ८ जिल्हयांकरीता संबंधित जिल्हा पाणलोट समितीने दिलेल्या सुधारित मान्यतेनुसार मराठवाडा पाणलोट विकास मिशनचा सुधारित कार्यक्रम राबविण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. मराठवाडा पाणलोट विकास मिशन अंतर्गत समाविष्ट मूळ कार्यक्रमानुसार १.४९ लक्ष हेक्टर ऐवजी आता सुधारित १.७१ लक्ष हेक्टर क्षेत्र उपचारित होईल.

२. मराठवाडयातील औरंगाबाद, जालना, बीड, लातूर, उस्मानाबाद, नांदेड, परभणी व हिंगोली या ८ जिल्हयांत मराठवाडा पाणलोट विकास मिशनची अंमलबजावणी करण्याकरीता आतापर्यंत रु.१०४.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. आता सन २००९-१० या आर्थिक वर्षात औरंगाबाद, जालना, बीड, लातूर, उस्मानाबाद, नांदेड, परभणी व हिंगोली या ८ जिल्हयांमध्ये मराठवाडा पाणलोट विकास मिशनच्या अंमलबजावणीकरीता **रु.३५.०० कोटी (अक्षरी रुपये पस्तीस कोटी फक्त)** इतका निधी **विवरणपत्र-अ** मध्ये दर्शविल्यानुसार मंजूर व वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. यानुसार मराठवाडा पाणलोट विकास मिशनसाठी आतापर्यंत एकूण **रु.१३९.०० कोटी (अक्षरी रुपये एकशे एकोणचाळीस कोटी फक्त)** निधी मंजूर व वितरीत करण्यात आला आहे.

३. हा निधी खर्च करण्यास आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या निधीचे जिल्हानिहाय वितरण मराठवाडयातील औरंगाबाद, जालना, बीड, लातूर, उस्मानाबाद, नांदेड, परभणी व हिंगोली या ८ जिल्हयांना करण्यास आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. उपरोक्त मंजूर करण्यात आलेल्या निधीमधून समूह संघटन व प्रशिक्षण या बाबींवर खर्च न करता उपचारांवर खर्च करण्यात यावा. तसेच मेगा पाणलोटांमध्ये वन क्षेत्राचा समावेश असल्यास त्या क्षेत्रातील कामांसाठी वन विभागास तात्काळ निधी उपलब्ध करुन देण्यात यावा. याबाबतच्या सविस्तर मार्गदर्शक सूचना आयुक्त (कृषि) पुणे यांनी संबंधित अधिका-यांना तातडीने निर्गमित कराव्यात.

५. मराठवाडा पाणलोट विकास मिशन अंतर्गत मंजूर करण्यात आलेला निधी आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संबंधित जिल्हयांचे जिल्हाधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली गठीत करण्यात आलेल्या व जिल्हा अधीक्षक कृषि अधिकारी हे पदसिध्द सदस्य सचिव असलेल्या **कृषि तंत्रज्ञान व्यवस्थापन संस्था तथा आत्मा (Agricultural Technology Management Agency-ATMA)** या संस्थेच्या यासाठी सुरु केलेल्या स्वतंत्र खात्यात जमा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

६.   मराठवाडा पाणलोट विकास मिशन अंतर्गत जिल्हयांना मिळालेला निधी व त्यामधून होणारा खर्च यांचे स्वतंत्र लेखे ठेवण्यात यावेत. या कार्यक्रमांतर्गत सुरु केलेल्या प्रकल्पांवरच मंजूर **रु.३५.०० कोटी (अक्षरी रुपये पस्तीस कोटी फक्त)** निधीचा विनियोग करण्यात यावा. या कारणासाठी होणारा खर्च हा **मागणी क्रमांक एल-३, २५०१- ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, ०२, अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम, १०१, लहान पाटबंधारे, (०१) (०३) मराठवाडा पाणलोट विकास मिशन (योजनांतर्गत) (२५०१ ०५०२), ३१-सहायक अनुदाने** या लेखाशिर्षाखाली सन २००९-२०१० मधील मंजूर निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

७.   मराठवाडा पाणलोट विकास मिशनची अंमलबजावणी ४ वर्षांत पूर्ण करावयाची असल्याने चालू आर्थिक वर्षात मिशन अंतर्गतची कामे निश्चितपणे पूर्ण करण्यात यावीत. मात्र नांदेड, परभणी व हिंगोली जिल्हयामधील मंजूर मेगा पाणलोटांतील उपचारीत झालेले क्षेत्र वगळता उर्वरित क्षेत्र उपचारित करण्यासाठी आणखी एक वर्ष म्हणजे मार्च २०११ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

८.   मराठवाडा पाणलोट विकास मिशन अंतर्गत आतापर्यंत झालेली कामे लक्षात घेता या कार्यक्रमाच्या फलनिष्पत्तीबाबत जिल्हानिहाय स्वतंत्र पुस्तिका तयार करुन एक महिन्याच्या कालावधीत आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास सादर करावी.

९.   राज्यात मेगा पाणलोट विकासाचा कार्यक्रम मिशन तत्वावर प्रथमच राबविण्यात आला असल्याने या कार्यक्रमाचे अंतर्गत व त्रयस्थ संस्थेमार्फत मूल्यमापन करण्याची कार्यवाही आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी तातडीने करावी व त्याबाबतचा अहवाल ३ महिन्यांत शासनास सादर करावा.

१०.   सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक **२०१००३१५२१५२२१००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( रेखा भिडे )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन.**

प्रति,
मा. राज्यपाल यांचे खाजगी सचिव.
मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
मा.उप मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
मा.मंत्री (जलसंधारण) यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री (जलसंधारण) यांचे खाजग सचिव.
सर्व मा.मंत्री, मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
मा. मुख्य सचिव.
शासनाचे सर्व अतिरिक्त मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव.
सर्व विभागीय आयुक्त.
आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक,मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन,महाराष्ट्र राज्य,पुणे.
मुख्य अभियंता, लघु पाटबंधारे (स्थानिक स्तर),महाराष्ट्र राज्य, पुणे.
प्रधान मुख्य वन संरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
संचालक, सामाजिक वनीकरण, महाराष्ट्र राज्य, पुणे.

संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
जिल्हाधिकारी, औरंगाबाद/जालना/बीड/लातूर/उस्मानाबाद/नांदेड/ परभणी/हिंगोली.
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद/जालना/बीड/लातूर/उस्मानाबाद/नांदेड/ परभणी/हिंगोली.
संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मुंबई (प्रसिध्दी करीता).
विभागीय कृषि सहसंचालक, औरंगाबाद / लातूर.
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, औरंगाबाद/जालना/बीड/लातूर/उस्मानाबाद/नांदेड/ परभणी/हिंगोली.
सहसंचालक, सामाजिक वनीकरण वृत्ते, औरंगाबाद.
सर्व मुख्य वनसंरक्षक / सर्व उप वनसंरक्षक, औरंगाबाद विभाग.
उपसंचालक, सामाजिक वनीकरण वृत्ते, औरंगाबाद/जालना/बीड/लातूर/उस्मानाबाद/नांदेड/ परभणी/हिंगोली.
महालेखापाल, (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर.
महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र १ व २ , मुंबई व नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद/जालना/बीड/लातूर/उस्मानाबाद/नांदेड/ परभणी/हिंगोली.
सर्व मंत्रालयीन विभाग.
सर्व सह सचिव /उप सचिव/अवर सचिव/ कार्यासन अधिकारी (जलसंधारण खुद्द), मंत्रालय, मुंबई.
कक्ष अधिकारी (जल-११), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती जल-७.

## शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक मपामि २००९/प्र.क्र.७४/जल-७, दि.१५ मार्च, २०१० चे सहपत्र.

### विवरणपत्र - अ

(रुपये लाखात)

| अ.क्र. | जिल्हा (तालुका / पाणलोट क्रमांक) | सुधारित कार्यक्रम (जिल्हा पाणलोट विकास समितीने दिलेल्या मान्यतेनुसार) | | आतापर्यंत उपलब्ध करुन दिलेला निधी | उपलब्ध करुन दयावयाचा निधी | | | उपलब्ध करुन दिलेला एकूण निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | उपचारित होणारे क्षेत्र (हेक्टर) | प्रकल्प मुल्य | | कृषि विभाग | वन विभाग | एकूण | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| (अ) | औरंगाबाद विभाग | | | | | | | |
| १ | औरंगाबाद<br>औरंगाबाद जीपी-१६ | १८२३५.०० | १५०२.६२ | १२०२.६३ | १४६.८५ | ६०.८० | २०७.६५ | १४१०.२८ |
| २ | जालना<br>भोकरदन जीपी-११ | १७९१७.१९ | १६५३.८५ | १२६२.०८ | ३९१.७७ | -- | ३९१.७७ | १६५३.८५ |
| ३ | बीड<br>आष्टी एसए-१३ | ११९७०.७१ | १४२५.४० | १०२२.२० | १२९.९२ | २०.०८ | १५०.०० | ११७२.२० |
| | विभागीय स्तरावर | -- | -- | ३.०० | -- | -- | -- | ३.०० |
| | एकूण (अ) | ५५३२२.२९ | ४५८१.८७ | ३४८९.९१ | ६६८.५४ | ८०.८८ | ७४९.४२ | ४२३९.३३ |
| (ब) | लातूर विभाग | | | | | | | |
| ४ | लातूर<br>लातूर एमआर-१९ | १२२१३.०० | ८६०.०० | ८६०.०० | -- | -- | -- | ८६०.०० |
| ५ | उस्मानाबाद<br>भूम/ परांडा एसए-२७/ एसए-२९ | १११०६.०० | १४०२.९० | १४०१.६९ | -- | -- | -- | १४०१.६९ |
| ६ | नांदेड<br>किनवट एनपीजी-१६ | ३६७६८.०० | ३६००.२० | २१३६.५८ | ६१६.०८ | ५६३.३४ | ११७९.४२ | ३३१६.०० |
| ७ | परभणी<br>जिंतूर जीपी-४८ | २२२९४.०० | २२६०.२२ | १६५०.२२ | २१०.०० | ३९२.१६ | ६०२.१६ | २२५२.३८ |
| ८ | हिंगोली<br>हिंगोली/कळमनुरी पीपीजी-९ | २५७०९.०० | १९५१.६५ | ८११.६० | ९६९.०० | -- | ९६९.०० | १७८०.६० |
| | एकूण (ब) | ११६०९०.०० | १००७४.९७ | ६८६०.०९ | १७९५.०८ | ९५५.५० | २७५०.५८ | ९६१०.६७ |
| | * एकूण (क) | -- | -- | ५०.०० | -- | -- | -- | ५०.०० |
| | एकूण (अ+ब+क) | १७१४१२.२९ | १४६५६.८४ | १०४००.०० | २४६३.६२ | १०३६.३८ | ३५००.०० | १३९००.०० |

(signature)

* संनियंत्रण व मूल्यमापन यांसाठी रु.५०.०० लक्ष कृषि आयुक्तालय, पुणे स्तरावर ठेवण्यात आले आहे.

H:\Statements.hwp